।। श्रीगणेशाय नमः ।।

।। श्रीगुरुः शरणम् ।।

"२१व्या शतकातील कालसुसंगत आचार-धर्म" या ग्रन्थाचे प्रकाशन अनंत (मोहन) धुंडिराज दाते यांनी काही वर्षांपूर्वी केले.

या ग्रन्थात धर्मशास्त्राच्या मान्यग्रन्थात दिलेल्या निर्णयांना सोडून वेगळे निर्णय दिले आहेत.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थावर पुनर्विचार २६ जून २०२३ला व्हायचा आहे. वरील ग्रन्थाविषयी स्वतःचे मत सप्रमाण मांडण्याचा आग्रह काही लोकांनी केला. म्हणून हा लेख लिहीत आहे.

मी ८ महिन्यापासून आजारी आहे. आजारात काही कार्य बाध्य होऊन करावे लागते. त्यातील अनेक कार्यांपैकी हे ही एक कार्य आहे. त्याला करणें भाग झाले. असो.

वेद, वेदानुगामिनी स्मृति, सदाचार हे धर्म-निर्णयासाठी प्रमाण मानले जातात. २ सदाचार असताना आपल्या परम्परेत येणाऱ्या सदा-चाराची माहिती नसताना त्यातील आवडता सदाचार घेण्यासाठी –

"श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः।
एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणम्॥"

या श्लोकात 'स्वस्य च प्रियमात्मनः' सांगितले आहे. सदाचाराची मूळ स्मृति, त्या स्मृतिचे मूळ वेद अशा रीतीने सर्व धर्म वेदमूलक मानण्याची पद्धति मीमांसेत सापडते.

सांगितलेल्या धर्माबद्दल आणि निषिद्ध कार्याविषयी शंका आल्यास निर्णय कसा घ्यावा या बद्दल तैत्तिरीयोपनिषदात सांगितले आहे-

"अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचि-कित्सा वा स्यात्। ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनः युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा

ते तत्र वर्तेरन्। तथा तत्र वर्तेथाः। अथाभ्याख्यातेषु। ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनः। युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। ~~तथा तेषु वर्तेथाः~~ यथा ते तेषु वर्तेरन्। तथा तेषु वर्तेथाः।"

या वर सायणभाष्य असे आहे-

"एवमज्ञातमनुष्ठेयमर्थमुपादिश्यानन्तरं सन्दिग्धेऽनुष्ठेये निर्णयोपायमुपदिशति -

"अथ यदि० वर्तेथाः" इति। कर्म श्रौतमग्निहोत्रादिकं स्मार्तं सन्ध्यावन्दनादिकं च। "उदिते जुहोति" "अनुदिते जुहोति" इति वाक्यद्वयं श्रुतवतः श्रौते कर्मणि सन्देहः स्यात्। स्मार्तेऽपि सन्ध्यादेवता पुरुषमूर्तिः स्त्रीमूर्तिर्वेति वचनद्वयेन सन्देहः। वृत्तं कुलपरम्परागतो लौकिक आचारः। तत्रापि मातुलसुताविवाहमांसभक्षणादिविप्रतिपत्तिदर्शिनः सन्देहो भवति। तदानीं यस्मिन्देशे यस्मिन्काले यस्मिन्कुले स्वयं वर्तते तत्र तेषु देशकालकुलविशेषेषु वर्तमानाः संमर्शादिविशेषणविशिष्टा

ब्राह्मणास्तत्र तस्मिन्सन्दिग्धे विषये यथा वर्तेरं स्तथा त्वमपि वर्तस्व। रागद्वेषौत्सुक्यादि-दोषराहित्येन सम्यक्शास्त्रार्थनिर्णयकुशलाः सम्मर्शिनः। नित्यनैमित्तिकानुष्ठाने स्वयं प्रवृत्ता युक्ताः। तत्राप्यः समन्ताद्युक्ता आयुक्ताः। अवै-कल्येन सम्यगनुष्ठास्याम इत्येवमभियुक्ता इत्यर्थः। लूक्षेण क्रोधेनाऽऽग्रहेण वा रहिता अलूक्षाः। धर्ममेव कामयन्ते न तु लाभपूजा-दिकमिति धर्मकामाः।

इत्थं सन्दिग्धधर्मनिर्णयोपायमुपदिश्या-नन्तरं पातकादिशङ्कया निन्दितेषु पुरुषेष्व-व्यहार्यत्वे निर्णयोपायमुपदिशति -

" अथाभ्याख्यातेषु° तेषु वर्तेथाः" इति।

पूर्ववद्व्याख्येयम्।"

वरील निर्णयानुसार संमर्शी, युक्त, आयुक्त, अलूक्ष, धर्मकाम ब्राह्मणच शिष्ट ब्राह्मण आहेत.

"धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः।
ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः॥"

या श्लोकात ही तीच गोष्ट सांगितली आहे. ~~धर्मानुसार~~ धर्माने सपरिबृंहण वेदांचे ज्ञान प्राप्त केलेले ~~[illegible]~~ ब्राह्मण शिष्ट आहेत. अशा ब्राह्मणांची परिषद् धर्मनिर्णय करते.

"रागद्वेषविहीनास्तु सप्त पञ्च त्रयोऽपि वा।
यत्र सुमिलिता विप्राः सा यज्ञसदृशी सभा॥"

"त्रैविद्यो हैतुकस्तर्की नैरुक्तो धर्मपाठकः।
त्रयश्चाश्रमिणः पूर्वे परिषत्स्याद्दशावरा॥"

या श्लोकात परिषदेचे स्वरूप सांगितले आहे.

~~संमर्शी~~ सम्मर्शित्व, युक्तत्व, आयुक्तत्व, अलूक्षत्व, धर्मकामत्व, ब्राह्मणत्व हे धर्म २१ (ग्रन्थरचनाकार) लोकांत पर्याप्ति सम्बन्धाने आहेत की नाहीत हे सन्दिग्ध आहे. विद्वान् लोक साधकबाधक दृष्टीने त्यावर विचार करून ठरवितील. अशा स्थितीत २१ लोकांनी एकत्र येऊन ~~एकत्र~~ विचार करून निर्णय दिला म्हणून तो धर्मशास्त्रसम्मत परिषदेचा निर्णय होऊ नाहीं शकत.

म्हणून -

"अनाम्नातेषु धर्मेषु कथं स्यादिति चेद्भवेत्।
यं शिष्टा ब्राह्मणा ब्रूयुः स धर्मः स्यादशङ्कितः॥
धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः।
ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः॥
दशावरा वा परिषद्यं धर्मं परिकल्पयेत्।
त्र्यवरा वाऽपि वृत्तस्था तं धर्मं न विचालयेत्॥"

या वाक्यानुसार कालसुसंगत आचारधर्मग्रन्थ धर्मनिर्णायक आहे असे सांगता येत नाही.

श्रीमद्भागवताच्या सप्तम स्कन्धात १५ व्या अध्यायात सांगितले आहे -

"विधर्मः परधर्मश्च आभास उपमा छलः।
अधर्मशाखाः पञ्चेमा धर्मज्ञोऽधर्मवत् त्यजेत्॥
धर्मबाधो विधर्मः स्यात् परधर्मोऽन्यचोदितः।
उपधर्मस्तु पाखण्डो दम्भो वा शब्दभिच्छलः॥
यस्त्विच्छया कृतः पुम्भिराभासो ह्याश्रमात् पृथक्
स्वभावविहितो धर्मः कस्य नेष्टः प्रशान्तये॥"

तदनुसार धर्मशास्त्रीय निर्णय देत असताना याचा ही विचार करावा लागतो की दिला जाणारा निर्णय

पांच प्रकारच्या अधर्मशाखे कडे तर जात नाहीना?
सध्याच्या परिस्थितीत धर्मप्रचार, धार्मिक वृत्ति आणि धर्माविषयी श्रद्धा कमी झाल्यामुळे अनेक समस्या व्यवहारात येतात. त्यांना पाहून व्यवस्था देत असताना प्रमाणवाक्यांची सर्वत्र आवश्यकता असते. जवळ-जवळ २०० पुराण-ग्रन्थ (पुराण-पुराणसम्बन्धी ग्रन्थ), २०० आगम-ग्रन्थ आणि २०० तन्त्र ग्रन्थ आहेत. त्यांपैकी काही प्रकाशित आहेत व काही अप्रकाशित आहेत. जे लोक (विद्वान् लोक) सेवानिवृत्त आहेत त्यांना ~~सध्याच्या~~ काही पारिश्रमिक देऊन सध्याच्या काळात उपस्थित होणाऱ्या समस्येंचे समाधान त्या ६०० ग्रन्थात मिळते का हे पाहून त्या वचनांच्या आधारे निर्णय केला पाहिजे. या साठी लोकांनी व्यवस्था करावी ही विनंती ४० वर्षा-पासून अनेक आचार्य, मठाधीश व धार्मिक लोकांना ~~[illegible]~~ केली. त्यात कांही लोक

तूष्णीम् (मौन) राहिले व काहींनी फक्त वाचिक आश्वासन दिले. प्रत्यक्षात काही केले नाहीं. श्री प्रसाद महाराज अमळनेरकर यांनी पंढरपूरला धर्मसभा आयोजित करण्याचे मनोगत माझ्या समोर मांडले. त्यावेळी त्यांना मी सांगितले की धर्मसभा आयोजित करुन फारसा उपयोग होणार नाहीं. त्या साठी निर्णायक वचन शोधण्यासाठी वरील वर्णित ६०० ग्रन्थांना चाळण्याचे कार्य विद्वानांना सोपले पाहिजे. ते अर्थ व्यवस्था झाल्यावर होईल. त्या वर अमळनेरकर महाराजांनी सांगितले की धर्मसभाच करायची आहे. धर्मसभेत कित्येक समस्येंचे समाधान या साठी नाही झाले की त्यात अधार्मिक निर्णय घ्यायचा नव्हता. "न हि वचनस्यातिभारः", "वचनात् प्रवृत्तिः, वचनान्निवृत्तिः" हा सिद्धान्त आपल्याकडे स्वीकृत केला आहे. त्या मुळे त्या ६०० ग्रन्थांचे परिशीलन केल्यावरच निर्णय

सप्रमाण दिले जाऊ शकतात. पूर्ण विचार केल्या शिवाय दिले जाणारे निर्णय अधर्म-शाखेत जातात. येथे मी एक उदाहरण देतो. ज्योतिर्निबन्धग्रन्थात श्राद्धतिथिनिर्णय-प्रकरणात एक वाक्य आहे-

"दिनद्वयेऽपि सम्पूर्णा स्वकालव्यापिनी भवेत्।
तदा पूर्वा पितृश्राद्धे मातृश्राद्धे परा स्मृता॥"
(ज्योतिर्निबन्ध पृ० ३६२-३६३)

या वाक्याला पाहून दोन्हीं दिवसात अपराह्ण काळात मृततिथि (श्राद्धतिथि) पूर्ण असताना मातृश्राद्धात पहिल्या दिवशी तिथि घेऊ नये. दुसऱ्याच दिवशी तिथि घ्यावी असा निर्णय देता येत नाहीं. सकळ शिष्टाचारविरुद्ध तो निर्णय पडतो. म्हणून या वाक्यात पितृश्राद्ध अष्टकाश्राद्ध आहे. अष्टकाश्राद्धाला तिथि पूर्वदिवसीय अपराह्णव्यापिनी घ्यावी व दुसऱ्या दिवशी मातृश्राद्ध म्हणजे अन्वष्टकाश्राद्ध या साठी

तिथि घ्यावी असा निर्णय करावा लागतो तात्पर्य असे की कार्तिकादि मासात वद्य पक्षात अष्टमीच्या दिवशी अष्टकाश्राद्ध कर्तव्य असते. त्या अष्टकाश्राद्धासाठी अष्टमी तिथि अपराह्णव्यापिनी घ्यायची. त्याच्या पूर्वदिवशी सप्तमीश्राद्ध करायचे व द्वितीयदिवशी अन्वष्टकाश्राद्ध करायचे. सप्तमीश्राद्ध व अन्वष्टकाश्राद्धाच्या दिवसांचे निर्णय अष्टका-श्राद्ध (अष्टमीश्राद्ध) दिवस निर्णयावर अवल-म्बित आहे. ज्यांना परम्परेचे ज्ञान नाही त्यांच्या कडून वाक्यांना घेऊन निर्णय करीत असताना चूक होण्याची शक्यता असते. मनुस्मृतिव्याख्या मन्वर्थमुक्तावलीत कुल्लूकभट्ट सांगतात-

"मीमांसे बहु सेविताऽसि सुहृदस्तर्काः समस्ताः स्थ मे
जाता व्याकरणानि बालसखिता युष्माभिरभ्यर्थये
वेदान्ताः परमात्मबोधगुरवो यूयं मयोपासिताः।
प्राप्तोऽयं समयो मनूक्तिविवृतौ साहाय्यमालम्ब्यताम्।

सारांश असा की धर्मनिर्णय देणे फारच कठिण असते.

श्रीमद्भागवताच्या प्रथमस्कन्धात द्वितीय अध्यायात सांगितले आहे -

"धर्मस्य ह्यापवर्ग्यस्य नार्थोऽर्थायोपकल्पते।

नार्थस्य धर्मैकान्तस्य कामो लाभाय हि स्मृतः॥

कामस्य नेन्द्रियप्रीतिर्लाभो जीवेत यावता।"

तदनुसार धर्माचे फळ मोक्ष आहे. अर्थ नाहीं. अर्थाचे फळ धर्म आहे. काम नाहीं. कामाचे फळ जीवन आहे. इन्द्रियप्रीति नाहीं.

त्यामुळे धार्मिक निर्णय देताना सर्व गोष्टींचा विचार करावा लागतो. काहीं गोष्टी दृष्टान्तरूपात देऊन दिग्भ्रमित करणे योग्य नाहीं.

धर्मशास्त्रानुसार ऋतुमती होण्यापूर्वी कन्येच्या विवाह कर्तव्य असतो. सध्या तो संविधानाच्या विरुद्ध असल्याने करता येत नाहीं. आता कन्या मोठी झाल्यानंतर विवाह करीत असताना मुलीच्या वडिलांच्या कडून अनेक गोदान, मुलीकडून

पयोव्रत आणि वराकडून विवाहानंतर कूश्माण्डहोम करावा लागतो. म्हणजे वृषलीपतित्व दोष नष्ट होतो.

"विधवाकबरीबन्धो भर्तृबन्धाय जायते।
शिरसो वपनं (तस्मात्) कार्यं विधवया सदा।।"
(स्कन्दपुराण काशीखण्ड चतुर्थ अध्याय श्लो. ७४ पृ. ११२)

हे वाक्य यथास्थित आहे. विधवेने केशवपन न केल्याने ते वाक्य आणि त्यातील वर्णित फळ काही टळत नाहीं. धर्माचरण श्रद्धेने करायचे असते. बळजबरीने नाहीं. तसेच ते प्रदर्शनीसाठी करायचे नसते.

मृतव्यक्तीचे १२व्या दिवशी सपिण्डीकरण करण्याबद्दल वाक्य गरुडपुराणात असल्याने ती व्यवस्था आहे - आपद्धर्म नाहीं.

नळाच्या पाणीचा स्वीकार आपद्धर्मात येईल.

सोवळ्याबद्दल तत्तद्देशीय/तत्तद्देशानुसार आचार ग्राह्य करावे लागतात.

धर्मसिन्धूत सांगितले आहे- "अथ सूतिकाशुद्धिः। दशाहान्ते सूतिकाया अस्पृश्यत्वनिवृत्तिर्नामकर्म-जातकर्मादिप्राप्तकर्माधिकारश्च। जातेष्टि विवाहोपनयनादि-कर्मसु तु पुत्रप्रसूनां विंशतिरात्रान्तेऽधिकारः। कन्याप्रसूनां मासान्तेऽधिकारः।" (धर्मसिन्धु ३परिच्छेद पूर्वार्ध पृ. १४५)

तदनुसार पुत्रजन्म झाले असतां प्रसवदिनापासून ३० दिवस गेल्यावर सूतिकेची शुद्धि आणि कन्याजन्म झाले असतां प्रसवदिनापासून ४० दिवस गेल्यावर सूतिकेची शुद्धि होते. ~~[illegible]~~ त्यामुळे दोन्हींकडे ४० दिवस गेल्यावरच शुद्धि होते असे नाही.

कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थात पृ० १४ वर टीप दिली आहे —

"सध्याच्या काळात काही कारणास्तव मुलींचे उपनयन केले जाते त्यास प्रत्यवाय नसावा"

त्यावर असे सांगणे आहे की निर्णयसिन्धूत सांगितले आहे —

"यत्तु हारीतः — द्विविधाः स्त्रियः ब्रह्मवादिन्यः सद्योवध्वश्च । तत्र ~~[illegible]~~ ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भैक्ष्यचर्या इति, 'सद्योवधूनामुपनयनं कृत्वा विवाहः कार्यः' इति, तद् युगान्तरविषयम् ।

पुराकल्पेषु नारीणां मौञ्जीबन्धनमिष्यते ।
अध्यापनं च वेदानां सावित्रीवाचनं तथा ॥

इति यमोक्तेः।" (सटीकनिर्णयसिन्धु-
तृतीयपरिच्छेदपूर्वार्ध पृ. ९७३)

तदनुसार मुलींचे उपनयन पूर्वीच्या युगात होत असे, कलियुगात नाहीं. पूर्वीच्या युगात ही सर्व मुलींचे उपनयन होत नव्हते. काहींचेच झाले. म्हणूनच वाल्मीकिरामायणादिग्रन्थात सीता, पार्वती इत्यादींच्या उपनयनाचा उल्लेख सापडत नाहीं.

<u>विशेष</u>- सध्या ग्रन्थ सापडत नाहीं. पण मी लहानपणी एका ग्रन्थाच्या टिप्पणीत वाचले होते की पूर्वयुगात ऊर्ध्वरजस्का अश्या १२ किंवा १४ स्त्रिया होत्या. मात्र त्यांचे उपनयन आणि वेदाध्ययन झाले होते. सर्वांचे नाहीं. ह्या ऊर्ध्वरजस्का स्त्रियाच ब्रह्मवादिनी होत्या.

तदनुसार कलियुगात स्त्रियांचे उपनयन धर्मशास्त्रविरुद्ध आहे. धर्मशास्त्रसम्मत नाहीं. त्यामुळे त्यांचे उपनयन केल्यास प्रत्यवाय (दोष) येईलच.

"काल सुसंगत आचारधर्मग्रन्थात पृ०१५ वर सांगितले आहे-

"वेदाध्ययन करण्यासाठी उपनयन केले जाते. सध्याच्या काळात उपनयन केल्यानंतर वेदविद्येचे शिक्षण घेणाऱ्या बटूंचे प्रमाण २% ते ३% आहे म्हणजे उपनयनानंतर वेदाध्ययन न करता शालेय शिक्षण घेऊन नंतर नोकरी/व्यवसाय करणारे ९८% आहेत, म्हणून सध्याच्या काळात उपनयन हा विधिवत् संस्कार न राहता लौकिक समारंभ सोहळा झाला आहे. परदेशात वास्तव्यास असलेले भारतीय जुलै-ऑगस्ट किंवा डिसेंबर - जानेवारी या काळात भारतात येतात आणि मुलांची मुंज करतात. ज्योतिष अभ्यासक, पुरोहित यांचा मुहूर्तशास्त्राचा अभ्यास नसल्याने ते अशा काळातील मुहूर्त काढून देऊ शकत नाहीत. म्हणून वरील सर्व मुद्यांचा विचार करता केवळ लौकिक समारंभ करून मुंज करणाऱ्यांसाठी अडचणीच्यावेळी आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष व पौष या गौणकाळात उपनयनासाठीचे

इतर सर्व नियमांचे पालन करून असे उपनयनमुहूर्त घेता येतील तसेच अशा प्रकारची लौकिक मुंज करताना गौणकाला-प्रमाणे गुरु किंवा शुक्र यापैकी एखाद्याचा अस्तकाळ सुद्धा ग्राह्य धरावा. (संदर्भ: मुहूर्त-सिंधु अपवाद प्रकरण श्लोक २३ बृहस्पतीचे मत)

यद्येकस्यापि मूढत्वे शुभंकर्म न दोषकृत्।
द्वयोर्मूढत्वमेवोक्तं दोषदं गुरुशुक्रयो:॥

(मुहूर्तसिंधु, अपवाद प्रकरण, श्लोक २३ बृहस्पतीचे मत)

(गुरु किंवा शुक्र यांच्या अस्तकाळात उपनयन करताना त्या अस्तंगत ग्रहाचा १०८ जप करून सुवर्ण प्रतिमेचे पूजन व दान करावे.)

(गौणकाळात मंगलकार्य करताना विष्णूच्या सुवर्ण प्रतिमेचे पूजन व दान करून मंगलकार्य करावे)" (कालसुसंगत आचारधर्म पृ.१५)

या ठिकाणी बरेच प्रश्न उपस्थित होतात. आपल्याकडे संस्कारांपैकी उपनयन संस्कार मुख्य मानला जातो. उपनयन संस्काराने द्विजत्व प्राप्त होते. म्हणजे मूळ (ब्राह्मणबालक) जन्मापासून जरी ब्राह्मण असला तरी तो उपनयन संस्काराने द्विज होतो. मग वेदाध्ययन करणाऱ्या मुलांसाठी वेगळे मुहूर्त आणि वेदाध्ययन न करणाऱ्या मुलांसाठी वेगळे मुहूर्त असा दोन विभाग कशासाठी करायचा? "सध्याच्या काळात उपनयन हा विधिवत् संस्कार न राहता लौकिक समारंभ सोहळा झाला आहे" असे सांगणे प्रश्नोत्तरासाठी अपर्याप्त आहे. "कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थ लेखकांनी लोकांना संस्काराकडे प्रवृत्त करायचे की प्रवाहात वाहत जायचे? "परदेशात वास्तव्यास असलेले लोकांना सुट्टी मिळत नाहीं. मंगल कार्यालय उपलब्ध होत नाहीं" इत्यादि कथन ही उत्तरासाठी अपर्याप्त आहे. कारण संस्काराची मुख्यता की समारंभाची मुख्यता?

"मङ्गलकार्यालये [illegible] उपनयनं कुर्वीत" किंवा "मङ्गलमण्डपे उपनयनं कुर्वीत" असे काही सूत्र-ग्रन्थात सांगितले नाहीं. त्यामुळे माघादि ५मासातच घरी उपनयन संस्कार होऊ शकतो. वडिलांना सुट्टी मिळत नसेल तर इतरांनी उत्तरायणात योग्य मुहूर्तात घरी उपनयन करायचे. उपनयनाच्या लौकिक समारंभ मात्र सुट्टीच्या दिवसात मङ्गलकार्यालयात वडीलांनी करावा ज्यात सर्वांना बोलवून त्यांचा यथोचित सत्कार करावा व त्यांचा आशीर्वाद बटूने प्राप्त करावा. अशी व्यवस्था लावली तर सदाचारवर्जनाचा दोष लागणार नाहीं आणि चुकीच्या वेळेत म्हणजे शास्त्रद्वारा अविहित [illegible] कालात उपनयन करण्याचा दोष ही लागणार नाहीं.

आता विचारणीय विषय आहे की गुरु आणि शुक्र या दोन ग्रहांच्या पैकी एका ग्रहाच्या अस्तात शुभकर्म करणे दोषावह नसेल तर कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थात [illegible]

"(गुरु किंवा शुक्र यांच्या अस्तकाळात
उपनयन करताना त्या अस्तंगत ग्रहाचा १०८
जप करून सुवर्ण प्रतिमेचे पूजन व दान
करावे)" (कालसुसंगत आचारधर्म पृ.१५)
हे विधान कशासाठी? अर्थात् १०८ जप व
सुवर्णप्रतिमेचे पूजनपूर्वक दान कां करायचे?
गुरु व शुक्र या दोन ग्रहांपैकी दोघांचे अस्त
असतानाच दोष शुभकर्मासाठी असतो केवळ
गुरु अस्त किंवा शुक्रास्त असताना दोष नसतो
हे सांगणारे बृहस्पतिमत जर खरे असेल तर
आजपर्यन्त पूर्वीच्या शिष्टलोकांनी व धर्मशास्त्र-
निबन्धकारांनी केवळ गुर्वस्तकाळात अथवा केवळ
शुक्रास्तकाळात मङ्गलकार्य करण्याचे व्यवहारात
कां आणले नाहीं? ज्योतिर्निबन्धात आलेल्या-
"नष्टे चन्द्रे तथा शुक्रे नष्टे चैव बृहस्पतौ।
मङ्गलानि तथोद्वाहं व्रतोऽपि न कारयेत्॥"
(ज्योतिर्निबन्ध पृ. ८१)
या वाक्यात "शुक्रे नष्टे चैव बृहस्पतौ" यात
"नष्टे च" सांगितले आहे "नष्टे वा" सांगि-
तले नाहीं म्हणून गुरु-शुक्रास्त या दोघांच्या

अस्तकाळातच मङ्गलकार्य वर्जित आहेत. त्याच गोष्टीला मुहूर्तसिन्धूद्धृत –

"यद्येकस्यापि मूढत्वे शुभं कर्म न दोषकृत्।
द्वयोर्मूढत्वमेवोक्तं दोषदं गुरुशुक्रयोः॥"

हे बृहस्पतिमत स्पष्ट करीत आहे असे ही सांगता येणार नाहीं. कारण ज्योतिर्निबन्धोद्धृत–

"नष्टे चन्द्रे तथा शुक्रे नष्टे चैव बृहस्पतौ।
मङ्गलानि तथोद्वाहं व्रतितोऽपि न कारयेत्॥"

या वाक्यात "नष्टे चन्द्रे तथा शुक्रे नष्टे चैव बृहस्पतौ" हे उद्देश्यगत आहे. चकाराला समुच्चयार्थक मानून शुक्रबृहस्पति दोघांच्या अस्तकाळातच मङ्गलकार्य करू नये असे सांगता येत नाहीं. कारण उद्देश्यगत विशेषण अविवक्षित असते असे मीमांसेत सांगितले आहे. म्हणून केवळ शुक्रास्तात व केवळ बृहस्पति अस्तात मङ्गलकार्यनिषेध प्राप्त झाला. संग्रहशिरोमणिग्रन्थात सांगितले आहे–

अस्तादिफलमाह बादरायणः–

"गुरोरस्ते पतिं हन्याच्छुक्रास्ते चैव कन्यकाम्।
चन्द्रे नष्टे उभौ हन्यात्तस्मादस्तं विवर्जयेत्॥
बालभावे स्त्रियं हन्याद् वृद्धभावे नरं तथा।
तस्माद् बाले च वृद्धे च विवाहं नैव कारयेत्॥"

(संग्रहशिरोमणि, नवमी प्रभा पृ. १२०)

या वाक्यात गुर्वस्तकाळात विवाह केले तर
पतिमृत्यु आणि शुक्रास्तकाळात विवाह केले
तर कन्या(वधू) मृत्यु हे पृथक् (स्वतन्त्र)
फळ सांगितले असल्याने एकेकाच्या अस्तात
मंगल कार्य करता येणार नाही.
आता प्रश्न येतो की मुहूर्तसिन्धूत बृहस्पतिमत
जे उद्धृत आहे त्या श्लोकांची काय गति? त्या
प्रश्नाचे उत्तर असे की "धर्मज्ञसमयः प्रमाणम्"
या आपस्तम्बमहर्षिवाक्यानुसार शिष्टाचाराला
पाहून (असे कळते की-) हे बृहस्पतिमत श्लोक कोणत्या तरी
ग्रन्थात प्रक्षिप्त मिळाला. त्याच्या प्रक्षिप्तत्वाचा
विचार न करता मुहूर्तसिन्धुकारांनी त्याला खरे मानून
ग्रन्थात उद्धृत केला. अतः पूर्वीचा आचार व मतच
बरोबर आहे. गुरु किंवा शुक्रापैकी एकाच्या अस्तात
शुभकर्म करता येईल हे नवीनमत बरोबर नाही.
तसेच आषाढ-श्रावणादिमासांत उपनयन करण्याचे
विधान करणे ही बरोबर नाही. कारण तसे शिष्टाचार नाही.
"वसन्ते ब्राह्मणमुपनयीत ग्रीष्मे राजन्यं शरदि
वैश्यम्" (धर्मसिन्धूद्धृत वचन)
या वचनानुसार शरदृतूत वैश्यांचे उपनयन
होईल. सध्याचे व्यापारी ब्राह्मण वैश्यच आहेत
त्यामुळे त्यांचे उपनयन शरदृतूत करण्यात काय

दोष आहे? असा प्रश्न करणे बरोबर नाहीं. कारण त्या ('व्यापारी') ब्राह्मणाची आत्महत्या झाली असतां प्रायश्चित्त सांगत असतांना आत्महत्या प्रायश्चित्ता बरोबर ब्राह्मणवध प्रायश्चित्तच सांगावे लागेल. म्हणून ब्राह्मणांच्या साठी माघादि पञ्चमासांतच उपनयन मुहूर्त देणें योग्य आहे.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात पृ० १६ मध्ये "दोन सख्ख्या भावांचे उपनयन एका दिवशी एका मंडपात करण्याविषयी" उपनयनानंतर वेदाध्ययन करणारे व उपनयनानंतर शालेय शिक्षण घेणारे दोन सख्ख्या भावांच्या विषयी जी दोन व्यवस्था दिली आहे तिची आवश्यकता नाहीं.

"सोदराणामपि समानसंस्कारौ विवाहौ च संकटे अब्दभेदात्कार्यौ। चतुर्दिनव्यवधानादेकदिन व्यवधानाद्वा कार्यौ। अतिसंकटे एकदिने कर्तृभेदेन मण्डपभेदेन वा कार्यौ।" (धर्मसिन्धु पृ० २०९)

या धर्मसिन्धूत दिलेल्या व्यवस्थेनुसार एका मण्डपात कर्तृभेदाने दोन सख्ख्या भावांचे उपनयन होऊ शकते.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात पृ० १६ मध्ये "कार्यापूर्वी काही दिवस सपिंडांचे अशौच असल्यास उपनयन कधी करावे" या शीर्षकात जे काही लिहिले आहे त्या बद्दल हे सांगायचे आहे की संकटकाळात

उपनयन-विवाहमध्ये नान्दीश्राद्ध होण्यापूर्वी जननाशौच आले असतां कूश्माण्डहोम व गोदान करून कार्य करावे. मृताशौच आले असतां कार्य करू नये. या विषयी धर्मसिन्धूत असे सांगितले आहे—

"महासंकटे प्रारम्भात्प्रागपि सूतकप्राप्तौ कूष्माण्ड-मन्त्रैर्घृतहोमं कृत्वा पयस्विनीं गां दत्वा पञ्चगव्यं प्राश्य शुद्धश्चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेत्। उपकल्पित बहु-संभारस्य सन्निहितलग्नान्तराभावेन नाशाद्यापत्तावप्येवं शुद्धिः। इदं जननाशौचमात्रविषयमिति मार्तण्डादौ।"
(धर्मसिन्धु तृतीयपरिच्छेद पूर्वार्ध्द पृ. २१३)

या वर टिप्पणी अशी दिली आहे—

"मुहूर्तमार्तण्डे—
चेत्स्यात्सूतकमुक्तपूर्वसमये ऽनारब्धकार्ये बुधः
कूष्माण्डीघृतहोमतोऽपि जननाशौचे क्वचित्कारयेत्। इति।
व्यारव्या- उक्तपूर्वसमये यज्ञोद्वाहनचौलमौञ्जिकमित्यत्रोक्ते पूर्वकाले अनारब्धकार्ये सति कर्मणि अनारब्धे सति संकटे च प्राप्ते सति कूष्माण्डीघृतहोमतः कूष्माण्डीभिर्यद्देवा देवहेळ-नमित्यादिमन्त्रैर्घृतहोमः कूष्माण्डीघृतहोमः तेन जननाशौचे कर्म आचरेत्।" (धर्मसिन्धु पृ. २१२ यातील जन्मदशाहमध्ये टिप्पणी)

सर्व निर्णय धर्मसिन्धूप्रमाणे घ्यावेत. म्हणजे चूक होणार नाही.

बऱ्याच जागेत एकदा सांगितलेली गोष्ट पुनः आली आहे त्या सर्व ठिकाणी वर सांगितल्यानुसार सुधार करावा.

काही प्रदेशात चातुर्मासात विवाहमुहूर्त देतात याचा अर्थ त्या प्रदेशात विवाह करता येतो. त्यामुळे सर्वत्र विवाह करता येईल असे नाहीं. उदाहरणार्थ अधिकमासात व गुरु-शुक्रास्तात गयायात्रा होते म्हणजे संकटकालात अधिकमासात व गुरु-शुक्रास्तात ~~त~~ तीर्थ-यात्रा करता येते असे सांगता येत नाहीं.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात पृ० २० मध्ये "शुभकार्ये यांची निमंत्रण पत्रिका देवापुढे ठेवून ~~श्रीकार्य~~ देवाला आमन्त्रित करणे हा सुद्धा कार्याचा प्रथम (आद्य) आरंभच असतो" ~~हे जे सां~~ ही जी आरंभाची परिभाषा दिली आहे ती धर्मशास्त्र-सम्मत नाहीं.

"प्रारम्भो वरणं यज्ञे सङ्कल्पो व्रतसत्रयोः।
नान्दीमुखं विवाहादौ श्राद्धे पाकपरिक्रिया ॥"

या श्लोकात कोणत्या कार्याच्या प्रारंभाचा निर्णय कसा करावा हे सांगितले आहे. तो तसाच राहणार. शेष विषय पूर्वी सांगितला आहे. प्रारंभापूर्वी मृताशौच आले असतां कुश्माण्डहोम, गोदान, पञ्चगव्यप्राशन याने शुद्धि होत नाहीं हे लक्षात घ्यावे. ज्या ठिकाणीं जसे सांगितले आहे

तसेच केले पाहिजे. स्वतःच्या मनानुसार काही तरी व्यवस्था देणे बरोबर नाही.

"कालसुसंगत आचारधर्म" (ग्रन्थात) पृ. २२ मध्ये "विवाहानंतर प्रथम वर्षी नववधूने कोणत्या विशिष्ट महिन्यात सासरी राहू नये? याविषयी आधुनिक विचार" या शीर्षकात जो विचार मांडला आणि शेवटी सांगितले की "त्यामुळे हा विचार व ते नियम पाळण्याची आवश्यकता नाही" हे बरोबर नाही. काशीत काही वर्षापूर्वी पौष महिन्यात वधू सासरी असल्याने सासरा वारला हे पाहण्यात आले. धर्मसिन्धूत "उद्वाहात्प्रथमे शुचौ यदि वसेद् भर्तुर्गृहे कन्यका हन्यात्तज्जननीं, क्षये निजतनुं, ज्येष्ठे पतिज्येष्ठकम्। पौषे च श्वशुरं, पतिं च मलिने, चैत्रे स्वपित्रालये तिष्ठन्ती पितरं निहन्ति, न भयं तेषामभावे भवेत्॥" या वाक्यात "भर्तुर्गृहे कन्यका" सांगितले आहे. त्यामुळे असा निष्कर्ष निघतो की लग्न झाल्यानंतर १ वर्षाच्या आंत आषाढ मासात वधू पतिगृहात राहिली तर सासूला अनिष्ट, क्षयमासात पतिगृहात राहिली तर तिला (वधूला) अनिष्ट,

ज्येष्ठ मासात पतिगृहात राहिली तर ज्येष्ठ दीराला अनिष्ट, पौषमासात पतिगृहात राहिली तर सासराला अनिष्ट, अधिकमासात पतिगृहात राहिली तर पतीला अनिष्ट आणि चैत्रमासात वडिलांच्या गृहात राहिली तर वडिलांना अनिष्ट होईल. ज्यांच्या ज्यांच्या साठी त्या-त्या मासात अनिष्ट सांगितले आहे ते लोक जीवित नसतील तर दोष नाहीं. उदाहरणार्थ सासू जीवित नसेल तर वधूला आषाढ मासात पतिगृहात राहण्यात काही दोष नाहीं. याच प्रमाणे इतर लोकांच्या निधनानन्तर त्या-त्या ठिकाणी (पतिगृह किंवा पितृ-गृहात) राहण्यात दोष नाहीं. सासू जीवित असताना पतिगृहात वधूने आषाढ मासात राहू नये. पण तशी परिस्थिति असताना भाउयाच्या घरात किंवा आप्त नातेवाइकांच्या घरी राहण्यात काहीं अडचण नाहीं. त्या ठिकाणी ती (वधू) पतीबरोबर राहील. या प्रमाणे सध्याच्या काळात व्यवस्था लावणे योग्य आहे.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात पृ. २२ मध्ये "एका वर्षात अनुक्रमाने मंगळकार्य करण्याविषयी" या शीर्षकात जी गोष्ट सांगितली आहे त्यात

"व्रतबन्धस्तु कात्यायनमते मङ्गलरूपत्वाद् विवाहाद्युत्तरं कार्यः। अन्येषां मते मुण्डनरूपत्वान्न कार्यः।"

या धर्मसिन्धूक्त विषयाचे समायोजन आवश्यक आहे:

कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थात पृ. २३ मध्ये

"विधवांचा पुनर्विवाह। घटस्फोटित स्त्रीचा पुनर्विवाह करणे शास्त्रसंमत आहे या विषयी साधार विचार" या शीर्षकात जो विचार मांडला आहे त्या विषयी हे सांगायचे आहे की-

"वाग्दानोत्तरं वरस्य देशान्तरगमने षण्मासं प्रतीक्ष्यान्यस्मै देया। कन्यायाः शुल्कं प्रदाय गमने वर्षप्रतीक्षा। यत्तु बलाद्विवाहे सगोत्रत्वक्लीबत्वादिवरदोषे वा कन्यां सप्तपदीविध्युत्तरमप्यन्यस्मै देयेति तत्कलियुगे निषिद्धम्।" (धर्मसिन्धु, तृतीयपरिच्छेद पूर्वार्ध पृ. २१६)

या धर्मसिन्धुनिर्णयानुसार सप्तपदीविधीच्या पूर्वी कन्या दुसऱ्या वराला देता येते. सर्व प्राचीन निबन्धकारांनी याच गोष्टीचे समर्थन केले आहे.

"पाणिग्राहे मृते बाला केवलं मन्त्रसंस्कृता।
सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति॥"

हे वसिष्ठवचन कुठले आहे व त्या वाक्याची व्यवस्था निबन्धकारांनी कशी लावली आहे हे विचारणीय आहे. येथे ग्रन्थ नसल्याने त्या बद्दल काही सांगता येत नाहीं.

"निसृष्टायां ~~हुतायां~~ हुते वापि यस्यै भर्ता म्रियेत सः।
सा चेदक्षतयोनिः स्याद् गतप्रत्यागता सती॥
पौनर्भवेन विधिना पुनः संस्कारमर्हति॥" हे

बोधायनवाक्य कुठले आहे व त्याची व्यवस्था निबन्धकारांनी कशी लावली आहे ते अन्वेषणीय आहे. येथे ग्रन्थ नसल्याने त्याविषयी काही सांगता येत नाहीं.

वरील दोन वाक्यांची व्यवस्था निबन्धकारांनी कशी लावली आहे हे विद्वद्वर श्री राजेश्वर शास्त्री जोशी उप्पिनबेट्टगिरि (धारवाड-कर्णाटक) यांच्या कडून समजून घ्यावी.

"नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ।
पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते॥"

हे पराशरस्मृतिवाक्य आहे. या वर पराशरमाधवात असे सांगितले आहे की-

"नष्टो देशान्तर गमनेनापरिज्ञात वृत्तान्तः। अयञ्च पुनरुद्वाहो युगान्तरविषयः। तथा चादि-पुराणम्-

"ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं तथा।
कलौ पञ्च न कुर्वीत भ्रातृजायां कमण्डलुम्।।"
इति।" (पराशरमाधव अ०४ पृ० ४४)

काही पुस्तकात या पुढे इतका अधिक पाठ आहे-

"ऊढा शब्देन विधिवदूढा ग्राह्या, अन्यत्र पुनरुद्वाहस्यात्राप्यङ्गीकृतत्वात्।"

तैत्तिरीय संहितेत सांगितले आहे-

"तस्मान्नैका द्वौ पती विन्दते" (तैत्तिरीय संहिता षष्ठ काण्ड षष्ठ प्रश्न ४ अनुवाक)

त्यामुळे ब्राह्मण जातीत (स्त्रीच्या) द्वितीय विवाहाची स्वीकृति मिळत नसल्याने प्रश्न पडतो. पूर्वी सांगितल्याप्रमाणे पुराणादीचे २०० ग्रन्थ, आगमाचे २०० ग्रन्थ आणि तन्त्राचे २०० ग्रन्थ यांच्या परिशीलनाने पुष्ट प्रमाण काही मिळाले तर यावर विचार करून इदमित्थं असा निर्णय देता येईल.

या ठिकाणी 'घटस्फोट' शब्द तलाकच्या अर्थाने आहे. धर्मशास्त्रीय घटस्फोट विधीत आलेला 'घटस्फोट' नाहीं. विधवाविवाह व घटस्फोट (तलाक) झालेल्या स्त्रियांचे विवाह करणारे करतात, न करणारे करत नाहींत. त्या बद्दल काही वक्तव्य नाहीं. ते विवाह धर्म्य आहेत की नाहीं या बद्दल त्यांच्या धर्म्यत्वाला सांगणारे पुष्ट प्रमाण उपलब्ध होत नाहीं. जो पर्यन्त या बद्दल पुष्ट प्रमाण मिळणार नाहीं तो पर्यन्त ब्राह्मण जातीय स्त्रीचा विधवाविवाह व घटस्फोटा-नन्तरचा विवाह हे दोन्हीं कलियुगात सदाचार व धर्म आहेत असे सांगता येत नाहीं.

विचारासाठी उपयुक्त असल्याने मेरुतन्त्रातील वाक्य येथे उद्धृत करीत आहे —

"विवाहः पञ्चदशामः सर्वेषां संविधीयते।
विधवाया विवाहं तु पिप्पलेनैव कारयेत्॥
सर्वपापविनिर्मुक्ता सा तु विष्णुपदं व्रजेत्।
अब्राह्मणी च चेत्कुर्यादन्यमेकं तथा पतिम्॥"

(मेरुतन्त्र द्वितीय प्रकाश श्लो० १३९-१४० पृ० १३-१४)

येथे क्षत्रियादि स्त्रियांना वैधव्य आले असतां १ विवाह करण्याची परवानगी दिली आहे.

भूमिपूजन, वास्तुशान्ति इत्यादि मृताशौच आल्यावर कूश्माण्डहोमादि करून ही करता येणार नाहीं.

कार्तिक पूर्णिमेच्या दिवशीं कृत्तिकायोग असताना कार्तिकेयाचे दर्शन त्या-त्या कार्तिकेयक्षेत्रातील मन्दिरातील सदाचारानुसार ठरवावे. अर्थात दर्शनाचा सदाचार असेल तर दर्शन करावे व दर्शन करण्याचा सदाचार नसेल तर करू नये. म्हणजे काही हानि होणार नाहीं.

सूर्योदयापूर्वी ४ घटिका अरुणोदय असतो हा स्थूल मानाने निर्णय आहे. सूक्ष्म मानाने रात्रीचे १५ भाग करून शेवटचे २ भाग हा अरुणोदय काल येतो. याचे मूळवाक्य बृहन्नारदीय पुराणात मिळते.

शुद्ध मृत्तिकेच्या मूर्तीचे विसर्जन वाहत्या नदीत किंवा जलाशयात करणे शास्त्रीय आहे. एतत्सम्बन्धी शासकीय नियम विचारणीय आहे. अशुद्ध मूर्तीचे विसर्जन नदी किं जलाशयात करणे योग्य नाहीं. त्याच्याने पर्यावरण दूषित होते.

अदृश्य ग्रहणात जे ग्रहण दिसत नाहीं त्याचा निर्देश करू नये. पण जे अदृश्य ग्रहण दिसते त्याचा निर्देश करावा व त्याचे वेधादि ही पाळावेत.

"मलेऽनन्यगतिं कुर्यान्नित्यां नैमित्तिकीं क्रियाम्।"
असे वाक्य असल्याने अन्यगतिक विश्वकल्याणार्थ याग ही अधिक मासात करू नये.

काही गोष्टी परम्परेत येत असतात. त्यांचे मूळ कोठेतरी असते. म्हणून मूळ सापडत नाही असे सांगून त्यांना चुकीचे ठरविता येत नाहीं.

अन्त्ययात्रेत सहभागी झालेल्या लोकांनी सुद्धा श्मशानातून परत आल्यावर स्नान केले पाहिजे.

शास्त्रात औपासनाग्नि, श्रौताग्नि, कपालाग्नि, तुषाग्नि व उत्तपनाग्नि यांनी शवदहन करावे असे मिळते. त्यामुळे विद्युत् शववाहिनीत शवदहन करणे शास्त्रसंमत नाहीं.

क्रव्याद अग्नीत पुरुषाची आहुति द्यायची असते. त्यामुळे शरीर संपूर्ण असले पाहिजे. या दृष्टि-कोणातून नेत्रदान करणे योग्य आहे असे सांगता येत नाहीं.

श्रौताग्निहोत्रींचे आशौच प्रारम्भ दहनदिनापासून मानतात. मरणदिनापासून नाहीं.

कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थात १० व्या प्रकरणात आशौचासम्बन्धी काही नवे नियम देऊन आशौच संकोच म्हणजे कमी दिवस आशौच पाळण्यासाठी नियम सांगितले आहेत. ते वर-वर विचार करणाऱ्या लोकांना बरे ही वाटतील. पण या बद्दल सर्वांना करबद्ध प्रार्थना आहे की शुचिता व अशुचिता शास्त्रैकसमधिगम्य असल्याने त्यात बदल करणे हे घातक आहे. त्यामुळे धर्मसिन्धु आदि ग्रन्थांत जी आशौच व्यवस्था दिली आहे जिला कै. श्री धुंडिराज लक्ष्मण दाते यांनी पंचांगात छापले आहे तीच मान्य करणे योग्य आहे. नवीन लोकांनी दिलेली व्यवस्था मान्य करणे बरोबर नाहीं.

आशौचपालन केले जात नाहीं म्हणजे शास्त्रानुसार आशौच नाहीं असे होते का? आशौचपालन न केल्याने "तस्य वा एतस्य यज्ञस्य द्यावनध्यायो यदात्माऽशुचिर्यद्देशः

या श्रुतीत [redacted] सांगितलेले नियम बाधित होतात का? म्हणजे आत्मगत अशुचित्व नाहीसे होते का? पांचरात्रागमान्तर्गत ईश्वरसंहितेत वर्णित आशौच्य-स्पृष्टत्वादि दोष संपतात का? धार्मिक विषयात आशौच्य-विषयी संकोच करून "सर्वनाशे समुत्पन्ने ह्यर्धं त्यजति पण्डितः" या वाक्याला लावणे तसेच आहे ज्या प्रमाणे कोणी नदीत वाहत होता तर त्याच्या शरीराच्या वरील भागाला कापून घेतले आणि सांगितले की "सर्वनाशे समुत्पन्ने ह्यर्धं त्यजति पण्डितः।"

"अकरणान्मन्दकरणं श्रेयः" या न्यायाला येथे लावणे ही तसेच आहे जसे डायबिटीस रोगीला चिकित्सकानी सांगितले की गोड खाऊ नकोस. त्यात तो रोज पूर्वी १० जिलब्या खात होता तर त्याला कोणी सांगितले की तू रोज ५ जिलब्या खा, (५ खाऊ नकोस) आणि सांगितले की "अकरणान्मन्दकरणं श्रेयः।" व त्याने रोग वाढणे थांबेल का? मी स्वतः पाहिलेली घटना सांगत आहे-

मध्यप्रदेशात धामनोदच्या जवळ दूधी मध्ये श्री राघवानन्द ब्रह्मचारींच्या आश्रमात ऋक्संहिता-स्वाहाकारासाठी श्री वेदमूर्ति वसन्त चिन्तामणि फडके शिष्यांसह आले होते. प्रथम दिवशी अरणिमन्थन

करीत असतां अग्नि प्रकट होईना. केवळ धूम (धूर) येत असे. अडीच तास काळ गेला. त्यानंतर गणपति व नर्मदेला प्रार्थना केल्यावर अग्नि प्रकट झाला. नंतर चौकशी केल्यावर असे कळले की गणपतीच्या प्रार्थनेपूर्वी त्या मंडपात तमाशा पाहण्यासाठी १ रजस्वला स्त्री बसली होती. गणपतिप्रार्थनेनंतर ती बाई निघून गेली. मग अरणीतून अग्नि प्रकट झाला. ही गोष्ट मला श्री राघवानन्द ब्रह्मचारी महाराजांनी सांगितली.

अहमदनगरात एका डोंगरावर एका मंदिरावर कळशस्थापना करायची होती. त्या साठी तेथील प्रतिष्ठित व्यक्ति श्रीमान् मधुकाका यजमान होते. कलश वर नेताना एकाएक कळशाचे दुप्पट वजन झाले आणि त्याला वर नेणे अशक्य झाले. बांबूची शीडी होती. खाली मी शीडीला धरून होतो. मधुकाकांची दृष्टि माझ्यावर पडली. मी देवाला प्रार्थना केली. कळशाचे वाढलेले वजन कमी झाले. कळशस्थापना झाली. योगिनी क्षेत्रपाल गणपति बटुकांना नारळाची बलि दिली गेली. हे कार्य दुपारी झाले. संध्याकाळी मधुकाकांनी मला सांगितले की

त्या कार्यक्रमात कोणीतरी मृताशौचाची व्यक्ति आली होती. तिच्या स्पर्शाने असे संकट आले.

मी स्वतः पाहिले आहे - आमच्याकडे शेतात १ तूत (शहतूत) चे झाड होते. त्याला विटाळशी बाईने स्पर्श केला. ते झाड वाळले. विटाळशीच्या स्पर्शाने तुळशीचे झाड वाळते. विदेशात आशौचिस्पृष्ट जळ व शुद्ध व्यक्तिस्पृष्ट जळ या दोन्हीत (परीक्षानंतर) तारतम्य (फरक) पाहण्यात आले असे मी मोठ्या लोकांच्या मुखाने ऐकले आहे. वेदात सांगितले आहे -

"तस्माद्श्लीलनामंश्चित्रे। नावस्येन्न यजेत। यथा पापाहे कुरुते। तादृगेव तत्।" (तैत्तिरीय ब्राह्मण प्रथमाष्टक पञ्चम प्रश्न द्वितीय अनुवाक)

या ठिकाणी वेदात सांगितले आहे की अपवित्र स्थानात राहू नये व तेथे यजन करू नये. तेथे जर ते केले तर त्याचे फळ मिळत नाही. ज्याप्रमाणे दुर्मुहूर्तीत केलेले कार्य सफळ होत नाही.

~~"तस्माद्... ... ... ..."~~

"येन देवाः पवित्रेण। आत्मानं पुनते सदा।" (तैत्तिरीय ब्राह्मण प्रथमाष्टक चतुर्थ प्रश्न अष्टम अनुवाक)

"देवपवित्रं वा एतत् ।" (तैत्तिरीय आरण्यक द्वितीय प्रश्न)

या ठिकाणी मन्त्र द्वारा देवतेंचे पावित्र्य राहते असे सांगितले आहे. "तस्य वा एतस्य यज्ञस्य द्वावनध्यायौ यदात्माऽशुचिर्यद्देशः" (तैत्तिरीयारण्यक द्वितीयप्रश्न) या वेदवाक्यानुसार अशुचि आत्मा (शरीर) असताना वेदमन्त्र म्हणायचे नसतात. तसेच अशुचि देशात ही वेदमन्त्र म्हणायचे नसतात.

समजा एखादी व्यक्ति मेली तिचे आशौच धर्मसिन्धु आदि ग्रन्थानुसार १० दिवस आहे. कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थानुसार १० दिवसापेक्षा कमी दिवस म्हणजे ३ दिवस आशौच आहे. आशौच पाळणाऱ्यांनी कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थानुसार ३ दिवसच आशौच पाळले. आणि ४थ्या दिवशी आपण शुद्ध आहोत असे समजून मन्दिरात जाऊन देवस्पर्श केला. घरी गुरुजींना बोलावून रुद्राभिषेक, पवमानस्वाहाकार, सत्यनारायणपूजनादि केले तर या ठिकाणीं धर्मशास्त्र आणि आगमग्रन्थानुसार देवमूर्तीत कलाहीनता, वेदमन्त्रात शक्तिहीनता व निषेधातिक्रम आदि दोष यजमान व गुरुजींना लागतील की नाहीं याचा विचार मीमांसा

शास्त्रदृष्टीने व्हायला पाहिजे. लौकिक दृष्टीने नाहीं.
वरील उदाहरणात ४थ्या दिवशीं त्या गृहस्थाकडे यति-
भिक्षा होईल का?

"द्रव्याणि स्वामिसम्बन्धात् तद्दिने त्वशुचीनि वै।
स्वामिशुद्ध्यैव शुध्यन्ति वारिणा प्रोक्षितान्यपि॥"

या वाक्यानुसार मूलतः १० दिवस आशौच प्राप्त असताना तेथील वस्तूंची शुद्धि देखील १० दिवसानंतरच होईल. ४थ्या दिवशी नाहीं. म्हणून तेथील अन्नादि अशुद्ध राहतील.

"तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि॥
यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्॥"

या भगवद्गीताज्ञानुसार कर्तव्य केले पाहिजे. ऐच्छिक (इच्छानुसार) नाहीं.

रात्रीचे तीन भाग करून प्रथम-द्वितीय भागात मृत्यु झाले असतां प्रथम दिवसात आशौचारंभ आणि तृतीय भागात मृत्यु झाले असतां द्वितीय दिवसात ~~प्रथम दिवस~~ आशौचारंभ मानला जातो हा सामान्य नियम आहे. काही ठिकाणी देशविशेषात वेगळे नियम मानले जातात. अर्थात् मध्यरात्रीपासून दोन विभाग करून पूर्वोत्तर दिवस ठरवितात. यात वाद आले असतां तत्तद्देशीय सदाचार

निर्णायक ठरतील.

पराशरस्मृतीत वाक्य आले आहे—

"राजानः श्रोत्रियाश्चैव सद्यःशौचाः प्रकीर्तिताः।"
(पराशरस्मृति अ० ३ श्लो० २१)

यावर पराशरमाधवात अशी व्याख्या आली आहे—

"श्रोत्रियाः सद्यःप्रक्षालिकाः।" (पराशरमाधव अ०३ श्लो० २१ पृ० ६१४) येथे छापील पुस्तकात "क्षोत्रियाः" छापले आहे. शुद्ध पाठ पाहिला पाहिजे.

सध्याचे वैदिक काही सद्यःप्रक्षालिक नाहींत. त्यामुळे या वचनाने त्यांची शुद्धि मानता येत नाहीं. आशौचापवाद एक चक्रव्यूहासारखा विषय आहे. म्हणून त्यात धर्मसिन्धूत आशौचापवाद जो दिला आहे त्या प्रमाणे चालणे बरे.

कमी आशौच सांगणारे वाक्य पूर्वयुगात चालणारे आहेत असा अभिप्राय पराशरमाधवकारांचा आहे. पराशरमाधववाक्य असे—

"अत्र 'चत्वार्यधीतवेदानाम्' इत्यादिनोक्तोऽघसङ्कोचो युगान्तरविषयः।

'स्वाध्याय-वृत्त सापेक्षमघसङ्कोचनं तथा' इत्यनुक्रम्य

'कलौ युगे त्विमान् धर्मान् वर्ज्यानाहुर्मनीषिणः'

इति स्मृत्यन्तरेऽभिधानात्।

"दशाह एव विप्रस्य सापिण्डमरणे सति।

कल्पान्तराणि कुर्वाणः कलौ व्यामोहकिल्बिषी॥"

इति हारीतवचनाच्च। उक्तरीत्या क्षत्रियवैश्येऽपि वचनान्तर-विरोधः परिहर्तव्यः। एवञ्च सति, विप्रस्य समानोदकेषु त्रिरात्रं सपिण्डेषु दशरात्रम्। क्षत्रियादीनां द्वादशाहादि यन्मूलवचनोक्तं, तदेव स्थितम्" (पराशरमाधव पृ० ५७८ – ५७९)

पराशरस्मृतीचे वाक्य आहे-

"युद्धतो निधने दाने आर्तो विप्रो निमन्त्रितः॥
तदैव ऋषिभिर्दृष्टं यथाकालेन शुद्ध्यति।"
(पराशरस्मृति अ० ३ श्लो० २२-२३)

यावर पराशरमाधव असे आहे-

"निधनशब्देन तत्साधनभूतः सङ्ग्रामो लक्ष्यते। तत्रान्नादिदाने चोद्यतः कृतोपक्रमः, आर्तः आपदं प्राप्तः, श्राद्धादौ निमन्त्रितो विप्रश्च, तदैव सद्य एव शुद्ध्यतीति ऋषिभिर्दृष्टम्। यथाकालेन द्वादशरात्रादिना तदर्थः।" (पराशरमाधव अ०३ श्लो० २२-२३ पृ० ६१५)

यात युद्धाच्या ठिकाणी अन्नदानासाठी तयारी केलेल्या व्यक्तीला अन्नदान करण्यात आशौच नाही. आर्त ~~म्हणजे~~ म्हणजे आपत्तीत सापडलेल्या व्यक्तीला आशौच नाही. श्राद्धा- मध्ये निमन्त्रित विप्राला आशौच नाही. या विषयी धर्म- सिन्धूत सांगितले आहे-

"निमन्त्रणोत्तरं विप्रस्य सूतके मृतके वा प्राप्ते आशौचं न। निमन्त्रणं च द्वितीयक्षणरूपं समन्त्रकं ग्राह्यं न लौकिकमिति भाति। कर्तुस्तु पाकपरिक्रियोत्तरमाशौचाभावः। पाकपरिक्रिया च समन्त्रकं पाकप्रोक्षणमित्याहुः।" (धर्मसिन्धु तृतीय परिच्छेद उत्तरार्ध पृ० ३५१)

तदनुसार श्राद्धात समन्त्रक द्वितीयक्षण दिल्यानंतर श्राद्ध पूर्ण होई पर्यन्त त्या आमन्त्रित ब्राह्मणाला आशौच नाही. समन्त्रक पाकप्रोक्षण झाल्यानंतर श्राद्धकर्त्याला (आशौच आले असता) श्राद्ध पूर्ण होईपर्यन्त आशौच नाही.

धर्मसिन्धुत सांगितले आहे –

"ऋत्विजां मधुपर्कपूजोत्तरं तत्कर्मणि नाशौचम्।"

(धर्मसिन्धु तृतीयपरिच्छेद उत्तरार्ध पृ० ३७९)

तदनुसार पुरोहितांचे ही त्या त्या कार्यासाठी मधुपर्क-सहित वरण केले असतां ते-ते कार्य पूर्ण होई पर्यन्त आशौच नाहीं. येथे जे अपवाद सांगितले आहेत त्या प्रमाणे "आशौच प्राप्तीच्या अगोदर वरील निमन्त्रण, मधुपर्कसहित वरण इत्यादि झाले असतां नंतर आशौच आले तरी ते कार्य पूर्ण होई पर्यन्त आशौच नाहीं. ते कार्य पूर्ण झाल्यानंतर त्यांनी सम्पूर्ण आशौच पाळले पाहिजे, असे कळते".

त्यामुळे पूर्वी पुरोहितांना आशौच आले असतां पञ्चगव्यप्राशनादि करून त्यांची यजमानाच्या कार्यापुरती तात्कालिक शुद्धि होते असे म्हणतां येत नाहीं. याच प्रकारे रजस्वला स्त्रीचे (प्रथम-द्वितीय-तृतीय दिवसात) गोमय-गोमूत्रस्नान व पञ्चगव्यप्राशनाने तात्कालिक शुद्धी ही स्वीकारता येत नाहीं. आशौच प्रसंगात

२ आचार दिसतात. तमिळनाडूत १० दिवस घरची देवपूजा होत नाहीं. महाराष्ट्रात दुसऱ्यांच्या कडून देवपूजा करवितात. घरात ब्रह्मचारी नसताना

व बाहेरून कोणी योग्य पूजक न मिळाल्यास ~~xxxxxx~~ महाराष्ट्रात ही आशौच दिवसात देवपूजा न करणेच बरे. ~~xx~~ त्या साठी गोमय-गोमूत्रस्नान व पञ्चगव्यप्राशन करवून रजस्वला स्त्री ची शुद्धि झाली मानून तिच्या कडून देवपूजा करविणे बरोबर नाहीं. कोणाला किती दिवस आशौच आहे याचे निर्णय धर्मसिन्धू प्रमाणे व श्री धुण्डिराज शास्त्री दाते यांनी पंचांगात पूर्वी दिलेल्या निर्णया प्रमाणे करणे योग्य आहे. प्रवाहपतित लोकांच्या सोयी साठी शास्त्रीय आशौचात संकोच करून कालसुसंगत आचार-धर्मग्रन्थात दिलेली आशौच व्यवस्था अशा-स्त्रीय असल्याने त्याज्य आहे. आशौच व्यवस्था अशास्त्रीय देऊन ज्यांना जे रुचिकर आहे ते त्यांनी घ्यावे असे सांगणे धार्मिक विषयात ~~xx~~ प्रतारणा आहे. व्यवस्था नाहीं.

आशौचात भगवद्गीता, रामरक्षा, स्तोत्रे, ज्ञाने-श्वरी, गाथा, दासबोध इत्यादींचे वाचन आशौची-नी ~~कर~~ करू नये. भगवन्नाम जप करण्यात काही हरकत नाहीं.

कालसुसंगत आचारधर्म ग्रन्थात पृ० ८४ व ८५ त "अशौच निवृत्तीसाठी शुद्धि प्रक्रिया" या शीर्षकात जे लिहिले आहे त्यात जे पूर्वीच्या सदाचारानुरूप आहे ते ग्राह्य आणि जे तद्वि-रुद्ध आहे तेअग्राह्य आहे. आवश्यक असल्यास या विषयी धारवाडच्या राजेश्वर शास्त्री जोशींचे मत घ्यावे.

कालसुसंगत आचारधर्मग्रन्थात पृ० ८५ व ८६ त "तात्कालिक अशौच आणि शुद्धी" "धर्म-संकट प्रसंगी - रजस्वलेची शुद्धी" या शीर्षकात जे काही लिहिले आहे त्यात बराच अंश अग्राह्य आहे. पूर्वीच्या सदाचारानुसारच जाणे श्रेयस्कर आहे. या विषयी पूर्वी सांगितले आहे ते पहावे.

कालसुसंगत आचारधर्मग्रन्थात पृ० ८८ त "पुरोहितांची कर्मापुरती अशौच निवृत्ती" या शीर्षकात जे काही सांगितले आहे त्या बद्दल मी पूर्वी सांगितले आहे ते पहावे.

प्रवचनकार आणि कीर्तनकारांनी सुद्धा धर्मशास्त्रीय नियम पाळले पाहिजेत. स्वच्छन्द वागणे बरोबर नाहीं. अर्थात् त्यांनी ही प्राचीन परम्परेनुसार

आशौचनियम पाळले पाहिजेत. व्यवस्था प्रमाणसहित दिली पाहिजे. "ज्यांना पटेल त्यांनी स्वीकारावा" असे सांगून भागत नाही.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात पृ. ८३ त "परागंदा (निघून गेलेल्या) व्यक्तीचे अंत्यकर्म कसे करावे" या शीर्षकात अन्त्यकर्माबद्दल मत मांडले आहे. त्या विषयी पूरक रूपात हे सांगणे आहे की ज्योतिःशास्त्रानुसार प्रश्न मांडून ती व्यक्ति मृत आहे याची खात्री करून अन्त्यक्रिया करणे बरे.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात "पुनर्विवाहित मृत स्त्रीचे सपिंडीकरण" (पृ. ८५) या शीर्षकात जे काही सांगितले त्या बद्दल मला काही सांगता येत नाही. माझे मत आहे की प्रायश्चित्त करून नारायणबलि करावी. सपिण्डीकरणाच्या भानगडीत पडू नये. पुष्ट प्रमाणाशिवाय काही सांगता येत नाही.

"कालसुसंगत आचारधर्म" ग्रन्थात पृ. ९७ मध्ये "पुरोहितांनी अंत्यकर्मे सुद्धा करावीत" या शीर्षकात जी गोष्ट मांडली आहे ती महत्वाची आहे. विशेष म्हणजे ब्राह्मणांनी लोकांना तुच्छ लेखू नये.

स्त्रियांनी पुरोहित कर्म करणे हे असांप्रदायिक आहे. गुरुजींनी पुरोहित कर्म करणे सांप्रदायिक आहे. गुरुजींनी सन्तुष्ट राहावे व यजमानाने उदार (दानशील) व्हावे म्हणजे सर्व जमते.

मी ७ मासापासून आजारी आहे. अत्यावश्यक असल्याने जसे जमले तसे लेखन केले. यात अनवधानाने काही विषय विचारणीय असल्याची शक्यता आहे. ते सर्व श्री राजेश्वर शास्त्री जोशी उप्पिनबेट्टगिरि (धारवाड) यांच्या कडून नीट समजून घ्यावे.

"तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥"

या भगवद्गीतोक्त प्रकाराने विचारल्यावर राजेश्वर शास्त्री ~~जोशी~~ योग्य मार्गदर्शन करतील. पूर्व वर्णित ६०० ग्रन्थांच्या परिशीलनाची व्यवस्था जिज्ञासूंनी जर केली तर सर्वविषयी प्रामाणिक व्यवस्था होण्याची शक्यता आहे. म्हणून तिकडे सर्वांनी लक्ष द्यावे. धर्मशास्त्रीय मत स्पष्ट करण्यासाठी काही ठिकाणी कठिण शब्द वापरले गेले आहेत. त्यामुळे जर कोणांना कष्ट होत असेल तर त्याबद्दल मी क्षमाप्रार्थी आहे.

जो पर्यन्त मुलांना, मुलींना व पारिवारिक जनांना लहानपणा पासून धार्मिक शिक्षा, धार्मिक संस्कार, धर्माविषयी श्रद्धानिर्माण करण्याचे कार्य होणार नाहीं तो पर्यन्त हे सर्व कार्य कठिण आणि उत्तरो-

तर अवघड होणार. म्हणून तिकडे सर्व लोकांनी लक्ष द्यावे ही विनंती.

"अर्थकामेष्वसक्तानां धर्मज्ञानं विधीयते।
धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः॥
"वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम्।
आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च॥"

या स्मृतिवाक्यांच्या वर लक्ष देऊन मनुष्यजीवनाचे ध्येय (लक्ष्य) काय आहे तिकडे सर्वांना योग्य मार्गदर्शन केले पाहिजे. त्याने समस्यांचा प्रादुर्भाव कमी होईल आणि धार्मिक व्यवस्था देणे शक्य होईल.

सर्वे भवन्तु सुखिनः सर्वे सन्तु निरामयाः।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात्

भगवन्ता! सर्वांचे कल्याण करा!

गणेश्वर द्राविड.
(गणेश्वर शास्त्री द्राविड)
साङ्गवेद विद्यालय
रामघाट, वाराणसी
उत्तर प्रदेश

आषाढ शुक्ल सप्तमी
रविवार,
विक्रम संवत् २०८०
शालिवाहनशक १९४५
(दि० २५।६।२०२३ ई०)

॥ श्रीगणेशाय नमः॥

वेदमूर्ति श्री गोविंद बाळकृष्ण कानशुक्ले यांना सादर निवेदन. तुम्हीं २१ जून २०२३ रोजी पत्रद्वारा जी सूचना पाठविली त्या प्रमाणे हा लेख पाठवीत आहे. शुभं भवतु.

गणेश्वरद्राविड.

आषाढ ~~कृष्ण~~ शुक्ल (गणेश्वरशास्त्री द्राविड)
सप्तमी, विक्रमसंवत् साङ्गवेद विद्यालय
२०८०, शालिवाहन रामघाट, वाराणसी
शक १९४५ उत्तर प्रदेश

(दि० २५।६।२०२३ ई०)